**प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नागपूर यांच्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा, हिरापूर, ता.देवळी, जि. वर्धा येथील दुरुस्तीच्या व संरक्षक भिंतीच्या बांधकामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग,**
**शासन निर्णय क्र. शाआदु-२००९/प्र.क्र.३३१/का.१३**
**मंत्रालय विस्तार, मुंबई**
**दि :- २३ डिसेंबर २००९**

**शासन निर्णय** : कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, आर्वी, यांनी प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नागपूर यांच्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा, हिरापूर ता. देवळी, जि. वर्धा येथील दुरुस्तीची व संरक्षक भिंतीच्या बांधकामाची एकुण रू. ३४,४२,२३२/- (रु. चौतीस लाख बेचाळीस हजार दोनशे बत्तीस फक्त) इतक्या रकमेची ५ अंदाजपत्रके व आराखडे प्रशासकीय मान्यतेसाठी पाठविलेली आहेत.

२. सदर अंदाजपत्रके सहायक अभियंता, श्रेणी-१, सार्वजनिक बांधकाम उप विभाग, पुलगांव यांनी तयार केली असुन कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, आर्वी, यांनी तपासली आहेत. तसेच सहायक अभियंता, श्रेणी-१, सार्वजनिक बांधकाम उप विभाग, कारंजा व कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, आर्वी यांनी सदर अंदाजपत्रके साक्षांकित केली आहेत.

३. उपरोक्त शासकीय आश्रशाळेची अंदाजपत्रके सन २००९-१० च्या दरसुचीवर आधारित आहेत. तरी प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नागपूर यांच्या कार्यक्षेत्रातील उपरोक्त शाळेच्या एकुण रू. ३४,४२,२३२/- (रु. चौतीस लाख बेचाळीस हजार दोनशे बत्तीस फक्त) इतक्या रकमेस खालीलप्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | शासकीय आश्रमशाळेचे नांव | कामाचा तपशिल | अंदाजपत्रकीय रक्कम (रुपये) | दर सुची |
|---|---|---|---|---|
| १ | शासकीय आश्रमशाळा, हिरापूर, ता.देवळी, जि. वर्धा | मुलांच्या वसतीगृहांच्या दुरुस्तीचे काम करणे | ५,४१,९५२/- | २००९-१० |
| २ | शासकीय आश्रमशाळा, हिरापूर, ता.देवळी, जि. वर्धा | संरक्षक भिंतीचे बांधकाम करणे (डावी व उजवी बाजु) | ८,५७,५००/- | २००९-१० |

| | | | | |
|---|---|---|---|---|
| ३ | शासकीय आश्रमशाळा, हिरापूर, ता.देवळी, जि. वर्धा | संरक्षक भिंतीचे बांधकाम करणे (मागची बाजु) | ८,६७,३००/- | २००९-१० |
| ४ | शासकीय आश्रमशाळा, हिरापूर, ता.देवळी, जि. वर्धा | शिक्षकांच्या निवासस्थानाच्या दुरुस्तीचे काम करणे | ७,१२,५००/- | २००९-१० |
| ५ | शासकीय आश्रमशाळा, हिरापूर, ता.देवळी, जि. वर्धा | मुलींच्या वसतीगृहाच्या दुरुस्तीचे काम करणे | ४,६३,०००/- | २००९-१० |
| | | एकूण :- | ३४,४२,२३२/- | |

४. सदर बांधकामाचा खर्च सन २००९-१० साठी मंजुर तरतुदीतून भागविण्यात यावा.

५. सदर शासन निर्णय, वित्त विभाग क्र. विपअ-१००१/प्र.क्र. ४६/२००१ विनियम, दि. ११ जुलै २००१ मधील भाग-पहिला, उपविभाग-पाच अनुक्रमांक-१ नियम १३४ अनुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

६. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करून देण्यांत आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्र.२००९१२२९१९०२०७००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(गी. मो. चांदे )
अवर सचिव

प्रति,
आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक
अपर आयुक्त, आदिवासी विकास, नागपूर
प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प,नागपूर
महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१,मुंबई
महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, नागपूर
जिल्हा कोषागार अधिकारी, नागपूर.
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, आर्वी
सहायक अभियंता, श्रेणी-१, सा.बां. उपविभाग, पुलगांव
कक्ष अधिकारी (का.७), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवड नस्ती का-१३, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.